भूसंपादन आस्थापना- पुणे विभाग

**कृष्णा खोरे विकास महामंडळ, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या प्रकल्पाकरिता लागणारी खाजगी जमीन भूसंपादन कायद्यातील तरतुदीनुसार तातडीने संपादन करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या पुणे विभागातील विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांच्या पथकास दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(iii)/अ-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०२ मे, २०२५.

वाचा:- १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(iii)/अ-३,दि. २३.१०.२०२४

२) शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

३) उप आयुक्त, पुणे, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग यांचे पत्र क्र.भूसं/आरआर-१/कावि/७१/२०२५, दि.०४.०३.२०२५, व क्र. भूसं/आरआर-१ /कावि /१२० /२०२५, दि.२५.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भीय क्र.२ येथील दि.०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भीय क्र.३ येथील दि.०४.०३.२०२५ व दि.२५.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये, त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत शासनास विनंती केली आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भीय क्र.१ येथील दि.२३.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.१.०९.२०२४ ते २८.०२.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर राज्यात कृष्णा खोरे विकास महामंडळ, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत राबविण्यात येणारे विविध पाटबंधारे प्रकल्प, द्रुतगती महामार्ग व रस्ते बांधणी यांसारखी विकासाच्या कामांसाठी मोठ्या प्रमाणावर लागणाऱ्या खाजगी जमिनी भूसंपादन कायद्यातील तरतुदीनुसार संपादन करण्यासाठी व त्यानुषंगाने इतर भूसंपादनविषयक कामकाज हाताळण्यासाठी भूसंपादन अधिकाऱ्यांच्या/कर्मचाऱ्यांच्या पथकात कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, पुणे यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यात कृष्णा खोरे विकास महामंडळ, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत राबविण्यात येणारे विविध पाटबंधारे प्रकल्प, द्रुतगती महामार्ग व रस्ते बांधणी यांसारखी विकासाची कामे मोठ्या प्रमाणात हाती घेण्यात आलेली आहेत. या प्रकल्पांच्या कामांसाठी मोठ्या प्रमाणावर लागणाऱ्या खाजगी जमिनी भूसंपादन कायदयातील तरतुदीनुसार संपादन करण्यासाठी व त्याअनुषंगाने इतर भूसंपादनविषयक प्रलंबित कामे पूर्ण करण्यासाठी एकूण १८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.२३.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता, खालील तक्यातील सदर १८ अस्थायी पदांना पुढील अटी/शर्तीवर दि.०१.०३.२०२५ व दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे:-

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी काही पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त आहेत अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू असल्याचे निदर्शनास आले आहे. विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी यांनी सदरच्या पदांची नमूद केलेली अत्यावश्यकता विचारात घेता, सदर रिक्त पदे तात्काळ भरण्याच्या अटींवर मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीस विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

६) सदरची मुदतवाढ संपुष्ठात आल्यानंतर पुढील मुदतवाढीसंदर्भातील प्रस्ताव सादर करताना, शासन पत्र दि.०७.१०.२०२४ सोबत जोडलेले विहीत विवरणपत्र अ,ब,क,ड-१, ड-२ व ड-३ मध्ये नमूद माहिती सादर करावी अन्यथा अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी.

०२. ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

०३. सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष भूमी संपादन अधिकारी क्र.२६, पुणे | विशेष भूमी संपादन अधिकारी<br>अव्वल कारकून<br>मंडळ अधिकारी<br>लिपिक-टंकलेखक<br>चपराशी | १<br>१<br>१<br>१<br>२ |
| | | **एकूण** | **६** |
| २ | विशेष भूसंपादन अधिकारी, कृष्णा खोरे, सातारा | विशेष भूमी संपादन अधिकारी<br>अव्वल कारकून<br>मंडळ अधिकारी<br>लिपिक-टंकलेखक<br>चपराशी | १<br>१<br>१<br>१<br>२ |
| | | **एकूण** | **६** |
| ३ | विशेष भूसंपादन अधिकारी क्र.११, सोलापूर | विशेष भूमी संपादन अधिकारी (उपजिल्हाधिकारी श्रेणी)<br>अव्वल कारकून<br>मंडळ अधिकारी<br>लिपिक-टंकलेखक<br>चपराशी | १<br>१<br>१<br>१<br>२ |
| | | **एकूण** | **६** |
| | | **एकूण पदे** | **१८** |

**०४.** ही सर्व पदे शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.सी-१-२०२९, जमीन महसूल-००१-संचालन व प्रशासन (०१) भूमी संपादन आस्थापना(योजनेतर) (०१) (०३) आयुक्त, पुणे-०१, वेतन (२०२९ ००८२) या लेखाशीर्षाखाली टाकून तो खर्च २०२५-२०२६ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

**०५.** सदर पदांच्या आवश्यकतेबाबत दि.३१.०८.२०२५ पूर्वी आढावा पूर्ण करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०५०२११३५५२३११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANE VASANT GOPAL

Digitally signed by MANE VASANT GOPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c621b4190e31904b3dea97e81c85a31bbaaff04c1adea8a8811d74f01da4e724, cn=MANE VASANT GOPAL
Date: 2025.05.02 11:36:41 +05'30'

**(डॉ.वसंत माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (३ प्रती)
३) जिल्हाधिकारी, पुणे/सातारा/सोलापूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सातारा/सोलापूर
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६)
७) नियोजन विभाग
८) सार्वजनिक बांधकाम विभाग
९) जलसंपदा विभाग
१०) अ-१, अ-२, अ-४, ब-१,ई-१,ई-३ कार्यासने, महसूल व वन विभाग
११) निवड नस्ती (अ-३)